सन २०१७-१८ करीता महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजनांतर्गत (MEMS) कार्यान्वित सुसज्ज रुग्णवाहीकांवरील आवर्ती खर्चासाठी सर्वसाधारण योजनेंतर्गत निधी उपलब्ध करुन देण्याबाबत....

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ईएमएस-२०१७/प्र.क्र.१२४/ आरोग्य -३

१० वा मजला , गो.ते. संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २३ मे ,२०१७

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०११/ प्र.क. २२४/आरोग्य-३, दिनांक २८ मार्च, २०१३.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पीएचडी-३००११/ प्र.क्र. ३८७/ २०१६/ आरोग्य ७, दिनांक १५ जून, २०१६
३) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/ टे ४/राज्यस्तर/अनु. वितरण/१६-१७/BVG/४३६२/२०१७, दिनांक २१.०४.२०१७.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा प्रकल्प योजनेस शासन निर्णय, दिनांक २८ मार्च, २०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजना सन २०१३-१४ मध्ये दिनांक २६ जानेवारी, २०१४ पासून कार्यान्वित करण्यात आली. सदर शासन निर्णयानुसार या योजनेस सन २०१४-१५ व २०१५-१६ मध्ये काही प्रमाणात राष्ट्रीय आरोग्य अभियानामार्फत अनुदान प्राप्त होत होते आणि उर्वरित अनुदान राज्य योजनेतून वितरीत करण्यात येत होते. उपरोक्त दिनांक १५ जून, २०१६ च्या शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ पासून सदर योजना राष्ट्रीय आरोग्य अभियाना कडून संचालक, आरोग्य सेवा यांच्याकडे हस्तांतरीत करण्यात आली आहे. यास्तव सन २०१६-१७ पासून या योजनेंतर्गत आवर्ती खर्चासाठी आवश्यक निधी वितरीत करण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजना अंतर्गत कार्यान्वित असलेल्या सुसज्ज रुग्णवाहीकांवरील आवर्ती खर्चासाठी सन २०१७-१८ मध्ये अदा करावयाच्या माहे मार्च, २०१७ च्या रु.२०,२५,५०,१९४/- इतक्या देयकापैकी ७० टक्के रु.१४,१७,८५,१३६/- (रु.चौदा कोटी सतरा लक्ष पंच्याऐंशी हजार एकशे छत्तीस फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासन परीपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं -२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ मधील परिच्छेद क्र. ७ ते १८ व सोबतच्या परिशिष्टामधील अनु. क्र. ३ व ८ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. या पुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीचे लेखा परिक्षण झालेले नसल्यामुळे लेखा परिक्षण / महालेखापाल यांचे आक्षेप उपलब्ध नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमाशी संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च करण्यात येणार आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्र. आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, ०१ किमान गरजा कार्यक्रम (०१) (१०) - ट्रॉमा केअर युनिटची स्थापना - महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा, (२२१०४६८९) - ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१७ -१८ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर अनुदानासाठी सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र. क्र. अर्थसं -२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१२३४३२८३१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: CN = Ashok Tanbaji Uike, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.05.23 13:19:48 +05'30'

**(अ.ता.उईके)**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे.
५. सहाय्यक संचालक (लेखा व लेखा परिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
६. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
१०.वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
१२.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती (आरोग्य - ३).